**कक्ष अधिकारी पदावर पदोन्नतीसाठीच्या विभागीय परीक्षेसाठी ज्या पेपरला पुस्तके, शासन निर्णय व अधिसुचनांची प्रत सोबत बाळगण्यास अनुमती आहे त्याबाबतची यादी जाहीर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण/२३२३/प्र.क्र.१२/का.१७**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २६ एप्रिल, २०२३.

वाचा - १. शासन निर्णय क्र. विपनि-२७२२/प्र.क्र.८/का.१७, दि. ५ एप्रिल, २०२२
२. शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण/२३२३/प्र.क्र.१२/का.१७, दि. ३१ मार्च, २०२३

**शासन परिपत्रक -**

कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठीच्या विभागीय परीक्षेचा अभ्यासक्रम संदर्भ क्र. १ येथील दि. ५ एप्रिल, २०२२ च्या शासन निर्णयान्वये सुधारित करण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र. २ येथील दि. ३१.मार्च, २०२३ च्या शासन परिपत्रकानुसार विभागीय परीक्षेच्या पेपरवेळी सोबत बाळगावयाची पुस्तके, शासन निर्णय व अधिसुचनांची यादी प्रसिद्ध करण्यात आलेली आहे. सदर यादीत काही सुधारणा करणे आवश्यक असल्याचे दिसून आल्याने, सदर परिपत्रकाद्वारे दि. ३१ मार्च, २०२३ च्या परिपत्रकासोबतच्या यादीत खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे. खालील सुधारणांव्यतिरिक्त इतर सूचना दि. ३१ मार्च, २०२३ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार राहतील.

| पेपर क्र. | विषय | दि. ३१ मार्च, २०२३ च्या परिपत्रकासोबतच्या यादीत करावयाच्या सुधारणा |
|---|---|---|
| पेपर क्र. १ (भाग-१) | संविधान व इतर सेवाविषयक नियम | दि. ३१ मार्च, २०२३ च्या परिपत्रकात सदर पेपरसाठी बाळगण्यास परवानगी असणाऱ्या कागदपत्रांच्या यादीसोबतच खालील नमूद शासन निर्णय सोबत बाळगण्यास परवानगी देण्यात येत आहे :-<br>**आरक्षण धोरण**<br>१. सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना, दि. २९.०१.२००४<br>२. सामान्य प्रशासन विभाग, शासन पत्र क्र.बीसीसी-२०१६/प्र.क्र. २९५A/१६-ब, दि. २२.०७.२०१६<br>३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी-२०२१/प्र.क्र.३८७/१६-ब(ए), दि. ०६.०७.२०२१<br>४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय.क्र.दिव्यांग-२०१८/प्र.क्र.११४/१६-अ, दि. २९.०५.२०१९ |
| पेपर क्र. २ (भाग-१) | म.ना.से. (वेतन) व इतर | दि. ३१ मार्च, २०२३ च्या परिपत्रकात सदर पेपरसाठी बाळगण्यास परवानगी असणाऱ्या कागदपत्रांच्या यादीमध्ये नमूद खालील शासन अधिसुचना ही सदर पेपरसाठी बाळगण्याची आवश्यकता नसल्याने ही अधिसूचना यादीमधून वगळण्यात येत आहे:-<br>"महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम २००९ - वित्त विभाग शासन अधिसूचना दि. २२ एप्रिल, २००९." |

तसेच, कक्ष अधिकारी विभागीय परीक्षेतील पेपर क्र. १ व पेपर क्र.२ मध्ये गणितीय आकडेमोड करण्याची आवश्यकता असल्याने सदर पेपरसाठी साधे गणकयंत्र (Basic Calculator) सोबत बाळगण्याची परवानगी देण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०४२६१६१७१०३१०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( गीता रा. कुलकर्णी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई. (आयोगाच्या अधिपत्याखालील सहायक कक्ष अधिकारी यांचेकरीता)
२. सर्व मंत्रालयीन विभाग (मंत्रालयील संवर्गातील सहायक कक्ष अधिकारी यांचेकरीता तसेच विधी व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील सहायक कक्ष अधिकारी (विधि) यांचेकरीता).